**सन २०१६-१७ मधील मंजूर अर्थसंकल्पीत**
**<u>तरतूदीचे वितरण करणेबाबत</u>.**
**शेतक-यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा**
**करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य**
**(योजनेत्तर) (२४२५ १५०१).**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.अर्थस ०७१६/ प्र.क्र.२१८/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च २०१७

**<u>वाचा :-</u>**
१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक सीसीआर १४०६/प्र.क्र २४७/ २-स, दि. १७.५.२००६
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२०.४.२०१६
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा --प्रशा ५, दि.१०.५.२०१६
४. सहकार आयुक्त व निबंधक यांचे पत्र क्र कृषिपत ०१/योजना/खर्च सद्यस्थिती/२०१७, दि. २४.३.२०१७

**<u>प्रस्तावना:-</u>**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतक-यांना ६% व्याजदराने अल्पमुदत पीककर्ज पुरवठा होण्यासाठी शासकीय अर्थसहाय्याचा निर्णय घेतलेला आहे. या निर्णयानुसार, केंद्र शासनाचे धोरणानुसार बँका ज्या ठिकाणी शेतक-यांना ७% व्याज दराने कर्जपुरवठा करणार आहेत, त्या ठिकाणी बँकांनी ७ % ऐवजी शेतक-यांना ६ % व्याजदराने कर्जपुरवठा करावा असे राज्य शासनाचे धोरण आहे. या प्रयोजनासाठी १% व्याज फरकाच्या रक्कमेचा आर्थिक भार राज्य शासन सोसणार आहे. या निर्णयाचा फायदा सन २००६-०७ पासुन खरीप व रब्बी हंगामा मध्ये राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, राष्ट्रीयकृत बँका आणि प्रादेशिक ग्रामीण बँका व सन २०१३-१४ पासून खाजगी बँका यांच्याकडून शेतक-यांना रुपये ३ लाखापर्यंत अल्पमुदत पीक कर्ज वाटप करणा-या बँकाना देण्यात येत आहे.

राज्य शासनाच्या धोरणास अनुसरुन व्यापारी बँकांमार्फत शेतक-यांना दिलेले पीक कर्ज ६ % व्याज दराने उपलब्ध होण्यासाठी राज्य शासनाकडून १% व्याज परताव्याची रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

व्यापारी बँकांनी सन २०१५-१६ व त्यापुर्वीच्या आर्थिक वर्षामध्ये, शेतकऱ्यांना वितरीत केलेले पीक कर्ज वार्षिक ६% व्याजदराने उपलब्ध होण्यासाठी या पीक कर्जावर राज्य शासनाकडून बँकांना १% व्याज परतावा देय आहे. “शेतक-यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का व्याजदराने अर्थसहाय्य” या योजनेसाठी सन २०१६-१७ वर्षात मंजूर तरतूदीपैकी ३४,००,००,००० (रुपये चौतीस कोटी) एवढया निधीचे वितरण करुन खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग परिपत्रक क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र. ८९/ अर्थसं ३, दिनांक २०.४.२०१६ अन्वये “३३-अर्थसहाय्य” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी परिच्छेद ९ वगळता इतर सर्व परिच्छेद या योजनेस लागु नाहीत. तसेच या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा ५, दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद “ब” मधील २ नुसार वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/ अर्थसं ३ दिनांक २०.४.२०१६ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १, २, ५, ६, ७ व ८ संदर्भात सदर योजना ही नियमित राज्य योजनेतर योजना असल्याने व “३३ -अर्थसहाय्य” याखाली वितरीत होणार असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र २ व ३ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

६. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा ५, दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद “अ” नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

(१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, परिपत्रक क्र संकिर्ण २०१६/प्र क्र ८९ / अर्थसं ३, दिनांक २०.४.२०१६ अन्वये “३३- अर्थसहाय्य” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

(२) **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी रु. ४५००० लाख इतका निधी उपलब्ध असून त्यापैकी यापूर्वी रु ३०००० लाख एवढा निधी वितरीत झाला आहे.

(३) **यास्तव** मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे / होणार आहे.

(४) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

(६) वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- याबाबत क्षेत्रीय कार्यालयांना सहकार आयुक्त स्तरावरुन सूचना देण्यात येत आहेत.

(७) बांधकाम विषयक प्रस्तांवाना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

(८) खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

७. सदर तरतूद संबंधित बँकांना अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक , सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक , सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

८. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - १०७, सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) (१०) शेतक-यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य. (योजनेत्तर) (दत्तमत्त) (२४२५१५०१) ३३ अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०१६-१७ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१६४९०२७३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.03.29 16:51:22 +05'30'

**(दि.म.राणे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. निमंत्रक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, पुणे
५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक. लि. मुंबई.
६. कार्यकारी संचालक, सर्व सबंधित व्यापारी बँका.
७. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
८. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३ ,मंत्रालय, मुंबई
१०. कोषागार अधिकारी, पुणे.
११. निवड नस्ती-२-स.